20140910130434208

उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत येणाऱ्या शिक्षकीय रिक्त पदांच्या २/३ पदे केवळ तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी पध्दतीने भरण्यास मान्यता देण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र: बैठक १००२/(९१/२४०२)/आस्था-१,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २५ जुलै, २००२.

वाचा : १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-१०९७/प्र.क्र.२४-अ/अर्थ-१९, दि. २.६.१९९८

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-१०९७/प्र.क्र.२४-अ/अर्थ-१९, दि. १५.१२.१९९८

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी १०००/प्र.क्र.१३/२०००/ अर्थसंकल्प, दि. २१.६.२०००,

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/ वित्तीय सुधारणा, दि. १०.९.२००१.

**शासन निर्णय** : सन १९९८ पासून वित्त विभागाने संदर्भाधिन शासन निर्णयान्वये सर्व विभागांना पदे भरण्यास बंदी घातली होती. त्यामुळे मागील ३ ते ४ वर्षांपासून शासकीय व अशासकीय अनुदानित शैक्षणिक संस्थांना कुठल्याही प्रकारची पदे भरण्यास परवानगी नव्हती. या कालावधीत या विभागाच्या नियंत्रणाखालील शिक्षकीय पदे भरण्याच्या बंदीच्या निर्बंधात काही प्रमाणात शिथिलता देण्यात आली असली तरी देखील संपूर्ण पदे भरता आली नाहीत व त्याचा प्रतिकूल परिणाम मुलांच्या शिक्षणावर होत आहे. अशा परिस्थितीत सन २००१-२००२ मध्ये शिक्षकीय रिक्त पदांपैकी ५० टक्के ते २/३ पदे भरण्याची परवानगी दिली होती. तथापि, काही कारणास्तव सर्वच रिक्त पदे पूर्ण भरता आलेली नाहीत. याचा परिणामस्वरुप सन २००२-२००३ या शैक्षणिक वर्षात ६,[illegible] पदे रिक्त आहेत. या रिक्त पदांमुळे विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर होणारा विपरित परिणाम टाळण्यासाठी वर नमूद केलेल्या शिक्षकीय रिक्त पदांपैकी २/३ पदे कंत्राटी पध्दतीने भरण्यास खाली दिलेल्या अटींवर परवानगी देण्यात येत आहे:-

१) ही पदे कंत्राटी पध्दतीने ठोक वेतनावर भरण्यात येतील. करारपत्राचा नमुना सोबत जोडला आहे. करारपत्र रु. २०/- च्या स्टॅम्प पेपरवर करण्यात यावे. कंत्राटी पध्दतीने नियुक्ती दिल्यावर द्यावयाच्या ठोक वेतनाची रक्कम पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे देण्यात यावी:-

व्यावसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय

| अ.क्र. | पद | एकत्रित मासिक वेतन (रुपये) |
|---|---|---|
| १ | गट निदेशक/क. सर्वेक्षक/ प्रशिक्षण अधिकारी | ५,५००/- |
| २ | शिल्प निदेशक/गणित/चित्रकला निदेशक | ५,०००/- |
| ३ | पूर्ण वेळ शिक्षक | ६,५००/- |
| ४ | पूर्ण वेळ निदेशक | ५,०००/- |
| ५ | निदेशक | ४,०००/- |

तंत्र शिक्षण संचालनालय

| अ.क्र. | पद | एकत्रित मासिक वेतन (रुपये) |
|---|---|---|
| १ | प्राचार्य (तंत्रनिकेतन) | १४,३००/- |
| २ | विभागप्रमुख(तंत्रनिकेतन) | १२,०००/- |
| ३ | अधिव्याख्याता(तंत्रनिकेतन) | ७,४५०/- |
| ४ | प्राचार्य (अभि./वास्तु./औषध महाविद्यालये) | १६,४००/- + ४०० (वि.वेतन) |
| ५ | प्राध्यापक(अभि./वास्तु./औषध महाविद्यालये) | १६,४००/- |
| ६ | सहाय्यक प्राध्यापक(अभि./वास्तु./औषध महाविद्यालये) | १२,०००/- |
| ७ | अधिव्याख्याता(अभि./वास्तु./औषध महाविद्यालये) | ८,०००/- |

उच्च शिक्षण संचालनालय व विद्यापीठे

| अ.क्र. | पद | एकत्रित मासिक वेतन (रुपये) |
|---|---|---|
| १ | प्राचार्य (१० वर्षांपेक्षा अधिक सेवा असलेले) | १२,०००/- |
| | प्राचार्य (१५ वर्षांपेक्षा अधिक सेवा असलेले) | १६,४००/- |
| २ | प्राध्यापक | १६,४००/- |
| ३ | प्रपाठक | १२,०००/- |
| ४ | अधिव्याख्याता | ८,०००/- |

कला संचालनालय

| अ.क्र. | पद | एकत्रित मासिक वेतन (रुपये) |
|---|---|---|
| १ | अधिष्ठाता | १२,०००/- + ७००/- (वि.वेतन) |
| २ | प्राध्यापक | १२,०००/- |
| ३ | अधिव्याख्याता | ८,०००/- |
| ४ | सहाय्यक अधिव्याख्याता (अनुदानित संस्था) | ५,५००/- |

२) कंत्राटी पध्दतीने वरील नियुक्त्या जास्तीत जास्त २ वर्षे किंवा महाराष्ट्र लोकसेवा आयोग/ विद्यापीठासाठीच्या/विद्यापीठाने महाविद्यालयांसाठी स्थापित केलेल्या विहित निवड समिती मार्फत निवड झालेला नियमित उमेदवार उपलब्ध होणे यापैकी जे अगोदर घडेल तेवढ्या कालावधीसाठी असतील. त्यानंतर या कंत्राटी नियुक्त्या आपोआप संपुष्टात येतील.

१) उच्च शिक्षण संचालनालयांतर्गत कंत्राटी पध्दतीने शिक्षकीय पदे भरण्यासाठी प्रत्येक महाविद्यालयात आणि विद्यापीठात खालीलप्रमाणे समिती नेमण्यात यावी.

| विद्यापीठ समिती | महाविद्यालय समिती |
|---|---|
| संबंधित विद्यापीठाचे कुलगुरु .. समितीप्रमुख | संबंधित महाविद्यालयाचे अध्यक्ष .. समितीप्रमुख |
| २ विषय तज्ज्ञ.. सदस्य | २ विषय तज्ज्ञ.. सदस्य |
| शिक्षक संवर्गातील मागासवर्गीय प्रतिनिधी.. सदस्य | शिक्षक संवर्गातील मागासवर्गीय प्रतिनिधी.. सदस्य |
| शासनाचा प्रतिनिधी. .. सदस्य | शासनाचा प्रतिनिधी. .. सदस्य |
| शिक्षक संवर्गातील महिला प्रतिनिधी.. सदस्य | शिक्षक संवर्गातील महिला प्रतिनिधी.. सदस्य |
| संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव.. सदस्यसचिव | संबंधित महाविद्यालयाचे प्राचार्य.. सदस्यसचिव |

वरील मागासवर्गीय प्रतिनिधी व महिला प्रतिनिधी हे शिक्षण क्षेत्रात कार्यरत असावेत. मागासवर्गीय प्रतिनिधी हे विद्यापीठ व्यवस्थापन परिषदेच्या सदस्यांपैकी असावेत.

२. उच्च शिक्षण संचालनालयांतर्गत शिक्षकीय पदांवर कंत्राटी पध्दतीने नियुक्ती देण्यासाठी उमेदवार नेट/सेट परीक्षा उत्तीर्ण असण्याचा नियम काटेकोरपणे पाळण्यात यावा. ज्या विषयांत नेट/सेट उमेदवार उपलब्ध होणार नाहीत, त्या विषयांची पुन्हा जाहिरात देऊन नेट/सेट परीक्षा उत्तीर्ण नसणारे पण अन्यथा पात्र उमेदवार कंत्राटी पध्दतीने विहित कालावधीसाठी भरण्यात यावीत.

३. व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत येणारी वर नमूद केलेली गट 'क' मधील शिक्षकीय पदे (प्रशिक्षण अधिकारी पद वगळता) स्थानिक रोजगार व स्वयंरोजगार कार्यालयामार्फत उमेदवारांची यादी मागवून निवड समितीमार्फत मुलाखती घेऊन कंत्राटी पध्दतीने जास्तीत जास्त दोन वर्षांसाठी किंवा नियमित्त स्वरुपात नियुक्तीने उमेदवार उपलब्ध होणे यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत या कंत्राटी नियुक्त्या चालू राहतील. त्यानंतर कंत्राटी नियुक्त्या आपोआप संपुष्टात येतील. प्रशिक्षण अधिकारी हे राज्यस्तरीय पद असल्याने प्रमुख वर्तमान पत्रांत जाहिरात देऊन विहित निवड समितीमार्फत मुलाखती घेऊन वरील अटींच्या अधिन राहून कंत्राटी पध्दतीने नियुक्त्या देण्यात याव्यात.

४. सदर पदांच्या नियुक्तीबाबतची जाहिरात राज्यातील प्रमुख वर्तमानपत्रांत प्रसिध्दीस देण्यात यावी. सर्व पदे भरण्याची प्रक्रिया दिनांक ३१ ऑक्टोबर, २००२ पर्यंत पूर्ण केली पाहिजे. जे महाविद्यालय/विद्यापीठ व शैक्षणिक संस्था याप्रकारे पद भरण्याची प्रक्रिया दिनांक ३१.१०.२००२ पर्यंत पूर्ण करणार नाहीत, त्या पदांचा दिनांक ३१.१०.२००२ नंतर शासनातर्फे आढावा घेऊन इतर ज्या शिक्षण संस्था, महाविद्यालये व विद्यापीठे यांत शिक्षकीय पदांची तांतडीने गरज आहे, त्या ठिकाणी ही पदे भरण्यास शासनातर्फे मंजूरी देण्यात येईल. त्यानंतर दिनांक ३१.१२.२००२ पर्यंत पदे न भरल्यास ती पदे कायमस्वरुपात व्यपगत झाली असे समजण्यात येईल. ही कार्यवाही दिनांक ३१ डिसेंबर, २००२ पर्यंत पूर्ण करण्यात येईल. या कंत्राटी पध्दतीच्या नियुक्तीसाठी सेवानिवृत्त शिक्षकांना नेमता येऊ शकेल. निवृत्त शिक्षकांना कंत्राटी पध्दतीने नियुक्ती दिल्यानंतर त्यांना मिळणाऱ्या ठोक वेतनातून निवृत्तीवेतन वजा करुन उर्वरित ठोक वेतन देण्यात यावे.

५. या शासन निर्णयासोबत संबंधित संचालनालयाच्या कक्षेतील संस्थानिहाय भरावयाच्या [illegible] रिक्त पदांचे विवरणपत्र संबंधित संचालकांना उपलब्ध करुन दिले आहेत. या विवरणपत्राप्रमाणेच नियुक्तींची पदसंख्या राहील, याची दक्षता संबंधित संचालनालयाने घ्यावी.

4

यासंबंधीत अधिक माहितीसाठी संस्थांनी संबंधित संचालकांशी व विभागीय अधिकाऱ्यांशी संपर्क साधावा.

६. शासनाच्या धोरणानुसार रिक्त पदे कंत्राटी पध्दतीने भरताना मागासवर्गीयांसाठी, महिलांसाठी, अपंगांसाठी इत्यादी असलेले आरक्षण पाळले जाईल, याची सर्व नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. एखाद्या पदासाठी आरक्षणातील उमेदवार उपलब्ध न झाल्यास इतर प्रवर्गातील उमेदवार नेमावा. मात्र निवड समितीमधील सर्व सदस्यांनी आरक्षित उमेदवार उपलब्ध झाला नसल्याचे प्रमाणित करावे. आरक्षित पदांवर कंत्राटी नेमणूका दिल्यामुळे संबंधित उमेदवारांना नियमित नियुक्तीचे हक्क राहणार नाहीत.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३६४/२००२/व्यय-५, दिनांक २९ जून, २००२ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सही)

(बा. वि. निकम)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) संचालक, व्यवसाय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) प्रभारी संचालक, प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) सर्व सहसचिव/उप सचिव/कार्यासन अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई/पुणे/कोल्हापूर/नागपूर/जळगांव/अमरावती/औरंगाबाद/नांदेड
८) सहसंचालक, तंत्र शिक्षण, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती,
९) उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/ नागपूर.
१०) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
११) कुलसचिव, श्रीमती नाथीबाई ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई.
१२) कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे.
१३) कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर.
१४) कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.
१५) कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
१६) कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.
१७) कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती.
१८) कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव.

प्रत माहितीसाठी :

मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
...ी (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
...ी (उच्च व तंत्र शिक्षण), मंत्रालय, मुंबई.
...त्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
...शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
... मंत्रालय, मुंबई